कृषि विभागाच्या विविध योजनांचा
लाभ पाणी वापर संस्थांना देणेबाबत...

**महाराष्ट्र शासन**
**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः कृविका -२०१५/प्र.क्र.५९/३-अे**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई ४०० ०३२
दिनांक:- **११ मार्च, २०१५**

**वाचा:-** महाराष्ट्र सिंचन पध्दतीचे शेतक-यांकडून व्यवस्थापन कायदा २००५, कलम ४ (२)

**प्रस्तावना :-**

महाराष्ट्र राज्यातील जलसंपदा प्रकल्पाच्या लाभक्षेत्रात महाराष्ट्र सिंचन पध्दतीचे शेतक-यांडून व्यवस्थापन कायदा २००५ अंतर्गत तसेच सहकार कायदा १९६० अंतर्गत प्रकल्पाच्या लाभक्षेत्रात पाणी वापर संस्था स्थापन झाल्या आहेत. या पाणी वापर संस्थांना सांविधिक मान्यता आहे. तसेच या पाणी वापर संस्थेचा उद्देश निर्मित सिंचन क्षमता आणि तिचा प्रत्यक्ष वापर यामधील तफावत भरुन काढणे आणि सिंचन व्यवस्थेचे वाटप, वितरण, वापर आणि निस्सारण यांचा वाढीव कार्यक्षमतेने वापर करुन त्याव्दारे भूपृष्ठावरील व भूगर्भातील पाण्याचा यथोचित वापर करुन जास्तीत जास्त फायदा मिळवणे आणि शेतक-यांना, एकत्रितपणे काम करुन शेतीची उत्पादकता वाढविणे हे आहेत.

कृषि विभागामार्फत स्थापन करण्यात येणा-या शेतक-यांच्या समूह/ गट शेतीचा उद्देश महाराष्ट्रातील शेती व शेती आधारित उद्योगांना चालना देणे व त्याव्दारे शेतक-यांना त्यांच्या उत्पादनात अधिकाधिक भाव मिळावा असा आहे.

जलसंपदा व कृषि विभाग यांच्या समन्वयासाठी यशदा, पुणे येथे दि.१० ऑक्टोबर, २०१४ रोजी उच्चस्तरीय अधिका-यांची एक दिवसीय कार्यशाळा घेण्यात आली होती. सदर कार्यशाळेतील शिफारस क्र.२ (अ), ८ व ९ खालीलप्रमाणे आहे:-

**शिफारस क्र.२ (अ) :-** मराठवाडा व पश्चिम महाराष्ट्रात गट शेतीचे प्रयोग यशस्वी झाले आहेत. गटशेतीमुळे पीक तंत्र व विपणन तंत्र (Marketing) यातील ज्ञानाचे व कौशल्याचे शेतक-यांमध्ये आदानप्रदान अत्यंत चांगले होते. याशिवाय गटशेतीचे अनेक फायदे दिसून आले आहेत. कोकण प्रदेशात जलसंपदा प्रकल्पाच्या लाभक्षेत्रात कृषि विभागाच्या सहाय्ने असे गट निर्माण करुन गट शेतीस प्रोत्साहन देण्यात यावे. विशेषत:- फलोत्पानासठी(Horticulture) हे गट निर्माण करुन त्यांना लागवडीपासून ते मार्केटिंग पर्यंत कृषि सक्षम करावे.

**शिफारस क्र.८ :-** जलसंपदा प्रकल्पाच्या लाभ क्षेत्रात म.सि.प.श. व्य कायदा २०० ५ नुसार पाणी वापर संस्था स्थापन झाल्या आहेत. या पाणी वापर संस्थेकडे साधारणत: ४०० हे लाभक्षेत्र व ३००ते ५०० शेतकरी सभासदर आहेत. या पाणी वापर संस्थेची स्वतंत्र कार्यालये आहेत. त्यांचे नियमित लेखेही ठेवले जातात. त्यामुळे कृषि विभागाच्या वेगवेगळया योजना (उदा.NMH) या पाणी वापर संस्था हा केंद्रबिंदू मानून राबविण्यात याव्या. त्यांना प्रशिक्षण द्यावे शेती, अवजारे, रासायनिक खत, बी-बियाणे यांचे प्रापण व वितरण या संबंधीच्या योजनेचे फायदे पाणी वापर संस्थांना देण्यात यावे.

**शिफारस क्र.९:-** कृषि विभागाचे ग्रामीण भागातील कृषि विज्ञान मंडळ हे पाणी वापर संस्थेस संलग्न करण्यात यावे. भूजल व सर्वेक्षण यंत्रणेमार्फत राबविण्यात येतअसलेले प्रयोग पाणी वापर संस्थेच्या माध्यमातून राबविण्यात यावे.

या पार्श्वभूमीवर जलसंपदा विभाग व कृषि विभागाच्या क्षेत्रिय अधिका-यांना काही मार्गदर्शक सूचना देण्याचे विचाराधीन होते.

**शासन परिपत्रक :-**

जलसंपदा प्रकल्पाच्या लाभक्षेत्रात महाराष्ट्र सिंचन पध्दतीचे शेतक-यांकडून व्यवस्थापन अधिनियम २००५ नुसार व सहकार कायदा १९६० नुसार राज्यात पाणी वापर संस्था स्थापन झाल्या आहेत. या पाणी वापर संस्था सांविधिकरित्या स्थापन झाल्या असल्याने त्यांना कृषि विभागाच्या विविध योजनांचा प्राधान्याने लाभ देण्यात यावा.

या पाणी वापर संस्थंना आत्मा अंतर्गत शेतकरी गट/ समूह म्हणून मान्यता देण्यात येत आहे. या योजनखाली फायदे घेण्यासाठी पाणी वापर संस्था व्यवस्थापन समितीने ठराव करुन संबंधित जिल्हयाचे प्रकल्प संचालक यांनी या पाणी वापर संस्थेस गटाचे नोंदणी प्रमाणपत्र देण्यात यावे. नोंदणी केल्याचा अहवाल जिल्हयाचे प्रकल्प संचालक यांनी वेळोवेळी संचालक (आत्मा),कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना सादर करावा. संचालक (आत्मा) पुणे यांनी सदर अहवाल जलसंपदा विभाग/ कृषि विभाग यांना अभिप्रायासह सादर करण्याची दक्षता घ्यावी.

पाणी वापर संस्थेच्या सध्या अस्तित्वात असलेल्या खात्यातच या गटाचे व्यवहार करण्यात यावे. पाणी वापर संस्थेचे पदाधिकारी हेच शेतकरी गटाचे पदाधिकारी असतील या संदर्भातील लेखे पाणी वापर संस्थेचे विविध पध्दतीनुसार ठेवण्यात यावे व लेखा परिक्षण सुध्दा त्याच पध्दतीने करण्यात यावे.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashatra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्यांचा सांकेतांक क्र. २०१५०३१३१७४०५५२८०१ आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Sugriv Sambhaji Dhapate

Digitally signed by Sugriv Sambhaji Dhapate
DN: c=IN, o=Govt Of Maharashtra, ou=Housing Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Sugriv Sambhaji Dhapate
Date: 2015.03.13 17:50:31 +05'30'

**( सु.सं.धपाटे)**
**उप सचिव, महाराष्ट्र राज्य शासन**

**प्रत,**

१. अपर मुख्य सचिव, (कृषि व पणन) कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.
२. प्रधान सचिव (जसंव्य व लाक्षेवि) यांचे स्वीय सहाय्यक , जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
३. प्रधान सचिव (जलसंपदा) यांचे स्वीय सहाय्यक, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
४. कार्यकारी संचालक, महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळ, पुणे.
५. कार्यकारी संचालक, गोदावरी मराठवाडा, पाटबंधारे विकास महामंडळ, औरंगाबाद.
६. कार्यकारी संचालक, विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळ, नागपूर.
७. कार्यकारी संचालक, तापी पाटबंधारे विकास महामंडळ, जळगाव.
८. कार्यकारी संचालक, कोकण पाटबंधारे विकास महामंडळ, ठाणे.
९. कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१०. सर्व मुख अभियंता जलसंपदा विभाग.
११. सर्व कृषि संचालक.
१२. सर्व सहसंचालक, कृषि
१३. सर्व अधीक्षक अभियंता, जलसंपदा विभाग
१४. सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी (जिल्हा परिषद)
१५. सर्व जिल्हा अधीक्षक, कृषि अधिकारी
१६. सर्व प्रकल्प संचालक, आत्मा.
१७. सर्व कार्यकारी अभियंता, जलसंपदा विभाग
१८. सर्व कार्यकारी अभियंता, जलसंधारण विभाग
१९. निवडनस्ती / लाक्षेवि (कामे)